आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२२-२३ या वर्षात कृषी विद्यापीठांना सहायक अनुदान योजनेसाठी निधी वितरण.
(लेखाशीर्ष २४०१ ८२९१)
(बाब ३६-सहायक अनुदाने (वेतन)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२२/प्र.क्र.७/कार्यासन-६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : २१ फेब्रुवारी, २०२३.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२२ /प्र.क्र.४३/अर्थ-३, दि.०४.०४.२०२२ व दि.०८.०२.२०२३.
२) आदिवासी विकास विभाग शा.नि.क्र.बीयुडी-२०२२/प्र.क्र.०७/कार्या-६, दि.२५.८.२०२२, दि.०४.११.२०२२ व दि.१६.२.२०२३
३) कृषि विभागाची नस्ती क्र.कृषिवि-१२२२/प्र.क्र.२३७/७-अे.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कृषि विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या कृषी विद्यापीठांना सहायक अनुदान या योजनेंतर्गत ३६-सहायक अनुदाने (वेतन) या बाबीखाली कृषी महाविद्यालयांतील कर्मचाऱ्यांच्या वेतनासाठी महाराष्ट्र विधानमंडळाच्या सन २०२२ मधील माहे डिसेंबर, २०२२ च्या अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेला रु.४१४.६८ लाख इतका निधी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित निधीमधून वितरीत करण्याबाबत वित्त विभागास संदर्भाधीन क्र.३ अन्वये प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र.टी-५ मधील मुख्य लेखाशीर्ष २४०१, पीक संवर्धन या मुख्य लेखाशीर्षाखाली **कृषी विद्यापीठांना सहायक अनुदान या योजनेंतर्गत ३६-सहायक अनुदाने (वेतन) या बाबीखाली कृषी महाविद्यालयांतील कर्मचाऱ्यांच्या वेतनासाठी रु.४१४.६८ लाख** इतका निधी सन २०२२-२३ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध अर्थसंकल्पित निधीमधून खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.लाखात)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | बाब | सन २०२२-२३ मधील अर्थसंकल्पीय तरतूद (पुरवणी मागणीसह) | यापूर्वी वितरीत निधी | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| कृषी विद्यापीठांना सहायक अनुदान | २४०१८२९१ | ३६-सहायक अनुदाने (वेतन) | ५१४.६८ | १००.०० | ४१४.६८ |
| | **एकूण** | | **५१४.६८** | **१००.००** | **४१४.६८** |

२. उपरोक्तप्रमाणे **एकूण रु.४१४.६८ लाख (अक्षरी रुपये चार कोटी चौदा लाख अडुसष्ट हजार फक्त) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव, कृषि विभाग** यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०४.०४.२०२२ व दि.०८.०२.२०२३ च्या शासन परिपत्रकांतील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून नियंत्रक अधिकारी यांनी झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र. ११९-२०२३/व्यय-१४, दि.१०.०२.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०२२०१२४२४१०३२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2023.02.22 11:19:55 +05'30'

**(राजेंद्र दे.भवारी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. प्रधान सचिव, कृषि विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. कार्यासन क्र. ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
९. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.